**गटई कामगारांना कामासाठी देण्यात येणाऱ्या बंदिस्त स्टॉलबाबत**

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
मंत्रालय मुंबई ४०० ०३२, दिनांक: ५ जून, २०००

# आ दे श

क्र.टीपीबी/४३९६/१५४३/प्र.क्र.२/९८/नवि.११

बृहन्मुंबई महापालिका अधिनियम १८८८ च्या कलम ३१३ (ब) अन्वये गटई कामगारांना वाहने व पादचाऱ्यांना अडथळा होणार नाही अशा ठिकाणी (रस्त्याच्या जागेत अथवा रस्त्याच्या चौकात) १ मी X १ मी आकाराचे बैठे (पीच) परवाने बृहन्मुंबई महापालिका देते. मुंबई प्रांतिक व महानगरपालिका अधिनियम १९४९ मधील कलम ३८५ मध्ये सुध्दा मुंबई प्रमाणेच तरतुद करण्यात आलेली आहे. तसेच महाराष्ट्र नगरपालिका अधिनियम १९६५ मधील कलम २८७ नुसार असे बैठे परवाने नगरपरिषदा देवू शकतात. थोडक्यात म्हणजे महाराष्ट्रातील सर्व नगरपालिका/महानगरपालिका क्षेत्रात संबंधित अधिनियमान्वये असे बैठे (पिच) परवाने देण्याची तरतूद आहे.

शासन निर्णय समाज कल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र.सिवचो/१०९७/प्रक्र९७५/मावक-२ दि.२१.१२.९७ अन्वये पादत्राणे दुरुस्त करणाऱ्या गटई कामगारांना त्यांची आर्थिक व सामाजिक उन्नती साधण्यासाठी १००% अनुदान तत्वावर पत्र्यांचे स्टॉल देण्यात येतात. सबब या गटई कामगारांना रस्त्याच्या कडेला बंदिस्त स्टॉलची परवानगी देण्यात यावी अशा स्वरुपाचे निवेदने शासनास प्राप्त झालेली आहेत.

महानगरपालिकेच्या/नगरपालिकांच्या विद्यमान धोरणानुसार अशा "पिच" परवान्याचे बंदिस्त स्टॉलमध्ये रुपांतर करण्यास परवानगी नाही तसेच अशा गटई कामगारांना बंदिस्त पक्के दुकाने घेणे आर्थिकदृष्ट्या परवडणारे नाहीत ही बाब लक्षात घेवून शासनाने आता असा निर्णय घेतलेला आहे कि गटई कामगारांना सर्व महानगरपालिका क्षेत्रात, (बृहन्मुंबई महापालिका क्षेत्र वगळून) नगरपालिका क्षेत्रात बंदिस्त स्टॉल खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून रस्त्याच्या कडेला उभारता येईल व त्याप्रमाणे संबधित महानगरपालिका(बृहन्मुंबई वगळून) व नगरपालिकेने गटई कामगारांना परवाने देण्यात यावेत.

**निकष व अटी**

१) २४ मीटर अथवा त्याहून अधिक रुंदीच्या रस्त्यावर असे परवाने देवू नयेत.

२) ९ मी.ते २० मी. रुंदीच्या रस्त्यावर रहदारी व पादचा-यांना अडथळा होणार नाही अशा ठिकाणी परवाने द्यावेत.

३) वैयक्तिक परवान्यांचा आकार १.२ मीटरX १.५० मीटर X १.८० मीटर (उंची) असावा. (४'x५'x६' फुट मागील बाजूस उंची व पुढील बाजूस उंची ६ १/२ फुट)

४) व्यवसायाची वेळ सकाळी ८ ते रात्री आठ अशी असावी.

५) परवान्याची मुदत १२ महिने असावी.

६) परवाना देताना जातीचा दाखला देणे आवश्यक आहे.

७) दोन परवान्यांच्या मधील किमान ५० मी.चे अंतर सोडणे आवश्यक आहे.

८) गटई कामगारांना त्यांची चपला/बूट दुरुस्तीची हत्यारे ठेवण्यासाठी, लाकडी अथवा पत्र्याची पेटी ठेवण्यास व दोन चार नवीन चपला/बुटांची जोडी विकण्या करीता ठेवण्यास मुभा राहील.

९) पावसाळ्यात पावसापासून संरक्षण होण्यासाठी १.२० मीटर x १.५० मीटर या आकाराचे प्लास्टिकचे आच्छादन घालण्यास परवानगी राहील.

१०) परवान्यांसाठी आलेल्या अर्जावर संबंधित नगरपालिका/महानगरपालिका यांनी जास्तीत जास्त ३ महिन्यांच्या आत निर्णय घ्यावा.

११) रहदारीत अडथळा होत आहे असे आढळल्यास दिलेले परवाने कोणतेही कारण न देता रद्द केले जातील मात्र इतर सोयीच्या जागा उपलब्ध झाल्यास रद्द झालेल्या परवानेधारकाना प्राथम्याने दिल्या जातील

१२) ज्या गटई स्टॉलला शासनाची आर्थिक मदत प्राप्त होणार आहे तो स्टॉल दुस-या व्यक्तींना हस्तांतरित करता येणार नाही.

१३) राज्य शासनाच्या समाज कल्याण विभागास तसेच संबंधित महापालिकेस/नगरपालिकेस आवश्यक वाटणा-या अटींचे पालन करण्यात यावे.

सदर आदेश समाज कल्याण विभागाच्या संमतीने (दिनांक ५.५.२००० चे अनौ.संदर्भ क्र.४ ) निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(सु.वि.देशपांडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सर्व महापालिका आयुक्त (बृहन्मुंबई वगळता)

२) सर्व मुख्याधिकारी नगरपरिषद.

३) संचालक नगर रचना महाराष्ट्र राज्य पुणे.

२. त्यांना विनंती करण्यात येते कि, सदर आदेश सर्व शाखा कार्यालये/विभागीय कार्यालयाच्या निदर्शनास आणून द्यावे.

४) संचालक, समाज कल्याण विभाग, मध्यवर्ती कार्यालये, पुणे.

५) सर्व उप सचिव/सह सचिव, नगर विकास विभाग

६) कक्ष अधिकारी (मावक-२), समाज कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) सर्व कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग.

८) निवडनस्ती.